**महिला व बाल विकास विभाग (खुद्द) तसेच विभागांतर्गत असलेली क्षेत्रीय कार्यालये यांचे मार्फत कार्यरत असलेली ४ संकेत स्थळांचे परिरक्षण तसेच १ संकेत स्थळ नव्याने विकसित करण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.आस्था-२०२१/प्र.क्र.३२/का.०१**
नविन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
**दिनांक: १०/११/२०२१.**

वाचा:-१. NICSI यांचा लि. यांचा दि. १७.१२.२०२० रोजीच्या ई-मेल द्वारे सादर प्रस्ताव.
२. NICSI यांनी दि. ११.०२.२०२१ रोजीचे देयक.
३.या विभागाचे समक्रमांकाचे दि.०२.०९.२०२१ रोजीचा शासन निर्णय.

**प्रस्तावना:-**

महिला व बाल विकास विभाग व त्याच्या अखत्यारीतील क्षेत्रिय कार्यालये, महामंडळ, आयोग इ. करीता संगणकीकरण / ई गव्हर्नन्स प्रकल्प अंमलबजावणीकरीता सर्व क्षेत्रिय कार्यालयांकरीता संगणक विषयक प्रस्तावांवर निर्णय घेण्यासाठी विभागाच्या दिनांक २४ मे २०१३ च्या शासन निर्णयानुसार प्रकल्प अंमलबजावणी समिती गठीत करण्यात आलेली आहे. विभागामार्फत तसेच क्षेत्रीय कार्यालयांकडून राबविण्यात येणाऱ्या योजना तसेच विविध कार्यक्रमांसाठी काढण्यात येणाऱ्या निविदा यांची माहिती सामान्य जनतेपर्यंत पोहचावी तसेच माहितीचे सनियंत्रण करण्यासाठी विभागांतर्गत ४ संकेत स्थळे कार्यरत असून त्याचे परिरक्षण तसेच १ संकेत स्थळाची नव्याने विकसित करावयाचे आहे. त्यानुसार महिला व बाल विकास विभाग तसेच विभागांतर्गत क्षेत्रीय कार्यालयांचे कामकाज ऑनलाईन करणे, महिती संकलित करणे, माहितीचे सनियंत्रण करण्याच्या अनुषंगाने ४ संकेत स्थळांचे परिरक्षण व १ संकेत स्थळ नव्याने विकसित करण्यासाठी च्या NICSI या शासकीय संस्थेमार्फत संदर्भ क्र.१ मधील प्राप्त प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देणे तसेच संदर्भ क्र.२ नुसार संकेतस्थळ परिरक्षण व विकसन यासाठी आवश्यक असलेल्या एकूण रु.३६,८९,८००/-(रु.छत्तीस लाख एकोणनव्वद हजार आठशे/-) इतक्या रकमेपैकी ४०% च्या प्रमाणात म्हणजेच रु.१४,७५,००० (रु.चौदा लाख पंचाहत्तर हजार ) इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त संदर्भ क्र.३ मधील शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे. महिला व बाल विकास विभाग तसेच विभागांतर्गत क्षेत्रीय कार्यालयांचे कामकाज ऑनलाईन करणे, महिती संकलित करणे, माहितीचे सनियंत्रण करण्याच्या अनुषंगाने ४ संकेत स्थळांचे परिरक्षण व १ संकेत

स्थळ नव्याने विकसित करण्यासाठी च्या NICSI या शासकीय संस्थेमार्फत प्राप्त पुढील प्रस्तावास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | बाब | रक्कम ( रुपये ) |
|---|---|---|
| १. | Cost for Development of 5 Websites | रु.१८,२७,१६७/- |
| २. | Annual Maintaince Support | रु.१,८२,७१६/- |
| ३. | Security Audit And GIGW Compliance Charges for all Web Portals | रु.९,१२,५००/- |
| ४. | NICSI Administration Charges (7%) | रु.२,०४,५६६/- |
| ५. | GST (18%) | रु.५,६२,८५१/- |
| ६. | **एकूण** | **रु.३६,८९,८००/-** |

२. तसेच ४ संकेत स्थळांचे परिरक्षण तसेच १ संकेत स्थळाची नव्याने विकसन असे एकुण ५ संकेत स्थळांसाठी एकूण रु.३६,८९,८००/-(रु.छत्तीस लाख एकोणनव्वद हजार आठशे/-) इतक्या रकमेपैकी **४०% च्या प्रमाणात म्हणजेच रु.१४,७५,००० (रु.चौदा लाख पंचाहत्तर हजार )** इतका निधी परिच्छेद क्र. ३ ते ७ मधील अटीच्या अधीन राहून NICSI संस्थेच्या खाते क्र. **NICSIP200185WDM** मध्ये जमा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत असून सदर रक्कम संक्षिप्त देयकाने अदा करण्यात यावी.

३. शासन परिपत्रक क्र. मुंविनि-२०१७/प्र.क्र.३८/२०१७/विनियम, दि. १८.१२.२०१७ मधील सुचनेनुसार ( २२५१ ०८७५ ) १७-संगणक खर्च या लेखाशिर्षाखालील दि.३०.०९.२०२१ यापूर्वीची तपशिलवार देयके प्रलंबित नाहीत.

४. दि.३०.०९.२०२१ नंतर संक्षिप्त देयकावर काढलेल्या सर्व तपशिलवार देयकांचा त्वरेने निपटारा करण्यात येईल.

५. या संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक एक महिन्याच्या आत सादर करण्यात येईल.

६. खर्च नियमित देयकाद्वारे करणे शक्य नसून त्यासाठी संक्षिप्त देयकावर रक्कम काढणे अनिवार्य आहे.

७. या संक्षिप्त देयकाचे तपशिलवार देयक विहित मुदतीत सादर करण्याची जबाबदारी लेखा अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांची राहील.

८. या प्रयोजनार्थ होणारा खर्च मागणी क्रमांक X-२, २२५१ सचिवालय सामाजिक सेवा (०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्प, (०१)(०२) ई-गव्हर्नन्स प्रकल्पाची अंमलबजावणी (कार्यक्रम), १७ संगणक खर्च ( २२५१ ०८७५ ) अंतर्गत सन २०२१-२२ या वर्षी उपलब्ध असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

९. सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३०५/२०२१/विनियम, दि. २७.१०.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक २०२११११०१७२१०२४७३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, pseudonym=58C42BF9F3ABBB1C15CFBC42D0AA8503E42564DB, serialNumber=7EBBBC3712E8D459EF90BF7AAE4EA46E9CAEBDD50CFECDE2EE7CE0454FA0416A, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2021.11.10 17:26:13 +05'30'

**( महेश वरूडकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (महिला व बाल विकास) मंत्रालय, मुंबई,
४. मा. राज्यमंत्री (महिला व बाल विकास) मंत्रालय, मुंबई
५. मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद/विधानसभा विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मंबई
७. **मा. प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई**
८. सह/उप सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.महालेखापाल, महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता) (लेखापरिक्षा), मुंबई.
११. अधिदान व लेखा अधिकारी कार्यालय, मुंबई
१२.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
१३.कक्ष अधिकारी-अर्थसंकल्प शाखा, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय मुंबई.
१४.कक्ष अधिकारी-रोख शाखा, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय मुंबई.
१५.कक्ष अधिकारी ( विनियम/व्यय-६ ) वित्त विभाग.
१६.निवडनस्ती-का१.